# भाग्यदायी मांजर

लेखन, चित्रे व सजावट: **सनी सेकी**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**





खूप वर्षांपूर्वी जपानमध्ये तोकुझो नावाचा एक खेळणी बनवणारा माणूस राहत असे. निरनिराळ्या सणांच्या जत्रेत आपली खेळणी विकण्यासाठी तो गावोगावी प्रवास करत असे.

मुलांना त्याची खेळणी खूप आवडत, तरीही त्याला त्यातून फक्त पोटापुरतेच पैसे मिळत. तो मनाशी विचार करायचा, ‘कधीतरी मी एखादी अशी खास  वस्तू बनवेन की सगळ्यांना ती घ्यावीशी वाटेल.’

आता येणारी जत्रा खूपच मोठी होती आणि त्यात बरीच खेळणी विकली जातील हे तोकुझोला माहित होते. म्हणून चांगली जागा शोधण्यासाठी तो घाईघाईने निघाला होता. प्रवास सुरु केला त्यावेळी लवकरच त्याचे आयुष्य किती बदलून जाणार होते याची त्याला काहीच कल्पना नव्हती.

वाटेत तो एका लहानशा खेड्यात पोहोचला तेव्हा घाबरलेले एक छोटेसे मांजर त्याच्यासमोरून जोरात पळत गेले. एक मोठा कुत्रा त्याच्यामागे लागला होता.

“अरे, अरे! थांब!” तोकुझो जोरात किंचाळला कारण टपाल घेऊन जाणारा  एक घोडा त्यांच्याच बाजूला जोरात दौडत येत होता. लहानशा मांजराला घोड्याची जोरदार लाथ लागली, पण त्यावेळी तोकुझो केवळ पाहण्याखेरीज काहीच करू शकला नाही.



हे सर्व इतक्या झटपट घडले की गावातल्या लोकांना घोड्याच्या पायाखाली आलेले मांजर दिसलेच नाही. पण त्याला बरेच लागले आहे हे तोकुझोच्या मात्र लक्षात आले.

“कदाचित मला त्याला वाचवता येईल, अजून त्याचा श्वासोश्वास तर चालू आहे.” तोकुझोला जवळच एक खानावळ दिसली तिथे तो मांजराला घेऊन गेला.





त्या रात्री तोकुझो खूप वेळ जागाच होता. मांजराच्या जखमी पायाला त्याने पट्टी बांधली आणि एका स्वच्छ कापडावर ते उबदार राहील अशा तऱ्हेने त्याला ठेवले. “तुझ्या गळ्यातल्या गोल घंटे प्रमाणे मी तुला आजपासून ‘तामा’ म्हणणार आहे,” तोकुझो म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळी तामाने डोळे उघडले आणि तो थोडासा हसतो आहे असे तोकुझोला वाटले.

“शाबास तामा! आता मला जरा बरे वाटले. आज मोठी जत्रा आहे, पण मी तुझ्याबरोबर आज या लहानशा खेड्यातच राहणार आहे. तुला बरे वाटले की मगच मी इथून जाईन.”





त्या दिवशी त्या लहान खेड्यातल्या मुलांना तोकुझोने थोडी खेळणी विकली. त्याला जे थोडेफार पैसे मिळाले होते, त्यातून त्याने दोन मासे विकत घेतले: एक आपल्यासाठी आणि एक तामासाठी.

‘आज रात्री आपण मजेत छान जेवण करू,’ त्याने विचार केला.

तो खानावळीत आला आणि त्याने दार उघडले. “तामा…” त्याने हाक मारली. पण मेणबत्ती पेटवल्यावर त्याला दिसले की तामा मरण पावला होता.

दुसऱ्या दिवशी सकाळी एका निसर्गरम्य ठिकाणी खड्डा खणून तोकुझोने तामाला पुरले आणि मोठ्या दु:खी मनाने तो तेथून निघाला.

मोठी जत्रा जवळ जवळ संपली होती.  पण अजून थोडा वेळ शिल्लक होता म्हणून तोकुझो तसाच पुढे चालत राहिला. अचानक आकाशात मोठाले काळे ढग जमले. ढगांचा गडगडाट सुरु झाला त्यावरून लवकरच मोठे वादळ होणार हे कोणालाही समजले असते.

तो चटकन पळत जाऊन एका मोठ्या झाडाच्या आडोशाला उभा राहिला. जोराचा पाऊस सुरु झाला होता आणि तो वाढतच होता.



तोकुझो आपल्या चेहऱ्यावरचे पाणी टिपत होता तेव्हा देवळाच्या दाराशी एक मांजर 'मियांव मियांव' करत असलेले त्याला दिसले. जणू काही ते त्याला देवळात येण्यासाठी बोलावत होते! आश्चर्य म्हणजे, ते काल मरण पावलेल्या तामासारखेच दिसत होते.



जोराचा पाऊस पडतो आहे हे विसरून तोकुझो मांजराकडे पळत गेला. "तामा, तामा... तू तामाच आहेस ना? तू इथे काय करतो आहेस? मला वाटलं की तू या जगात नाहीस!" असे म्हणत मांजराला हात लावायला तो पुढे वाकला, आणि अचानक...



“धडाम!” एकदम खूप मोठा आवाज झाला आणि क्षणभर डोळे दिपतील असा उजेड पडला. त्याने वळून पाहिले आणि तो चांगलाच दचकला. पावसातून वाचण्यासाठी तो ज्या झाडाखाली उभा होता त्याच्यावर वीज पडून ते जळत होते!

एका रहस्यमय मांजराने त्याला कसे वाचवले ते तोकुझोने सर्वांना सांगितले. लोकांना ही गोष्ट ऐकून फार आश्चर्य वाटले. पण कोणाचा त्यावर विश्वास बसेना. “आता वीज पडणार आहे हे मांजराला कसे काय कळेल? मेलेले मांजर तुला कसे बोलावेल?”

यावर काय उत्तर द्यावे ते तोकुझोला समजेना. “मांजराने मला वाचवले याबाबत मला काहीच शंका नाही, पण ते कसे, हे मी तुम्हाला सिद्ध करून दाखवू शकणार नाही.”

देवळातले गुरु महाराज हे सर्व ऐकत होते. ते म्हणाले, “कदाचित यामागे काहीतरी सत्य दडले असेल, पण आपल्याला ते नीट समजून घेता येत नाही. तोकुझो, आज रात्री तू आमच्याइथे देवळात रहा म्हणजे आपल्याला याबद्दल बोलता येईल.”





मग तोकुझो मनन-चिंतन करण्याच्या बागेत जाऊन विचार करू लागला. ‘तामाने मला वाचवले, पण लोकांचा त्यावर विश्वास बसत नाही. मग मी आता काय करू?’ त्याने विचार केला, ‘मी या मांजराचा एक पुतळा तयार केला तर... त्यामुळे माझ्याप्रमाणे सगळेच भाग्यवान होतील.’

त्याने गुरु महाराजांचा सल्ला घेतला. “थांब, मी तुझी इथल्या सर्वात कुशल कारागीराशी ओळख करून देतो. सध्या त्यांची तब्येत बरी नाही म्हणून त्यांची मुलगी त्यांची देखभाल करते. पण ते फार हुशार आहेत आणि काय करायचे याबद्दल तेच तुला सल्ला देतील.

म्हातारे कारागीर आजारी होते पण त्यांनी तोकुझोला आनंदाने सल्ला दिला. “मातीचा पुतळा बनवणे योग्य ठरेल आणि माझ्या कारखान्यात तुला लागेल ते सर्व सामान आहे. तू तिथे राहूही शकतोस. दुर्दैवाने, सर्व काम मात्र तुला एकट्यालाच करावे लागेल, कारण तुला मदत करण्याइतकी माझी तब्येत बरी नाही.”



तोकुझोने कारखान्याचे दार उघडले. आता कुठून बरे सुरुवात करावी? पुतळ्यासाठी लागणारे सामान आणि अवजारे सगळीकडे पडलेली होती. काय करावे हे त्याला सुचेना पण तरीही तो खूप उल्हसित झाला होता.



म्हाताऱ्या कारागिराने सांगितले होते ते आठवून त्याने कामाला सुरुवात केली. प्रथम त्याने माती पाण्यात कालवून घेतली.

मग तिला मांजराचा आकार द्यायचा होता. “पण हे तर मांजरासारखे दिसतच नाही!” तो आपल्याशीच म्हणाला.





त्यानंतर हे मातीचे पुतळे भाजण्यासाठी भट्टीत ठेवायचे होते. पण भट्टी पेटवण्यासाठी आधी लाकडाचे ओंडके फोडावे लागणार होते. त्याला वाटले होते त्यापेक्षा हे फारच कष्टाचे काम होते.

अखेर एकदाच्या मातीच्या वस्तू भाजल्या गेल्या. तोकुझोने भट्टीचे दार उघडले आणि आपल्या वस्तूंकडे पाहिले. त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. “ही माझी मांजरं! माझं काय बरं चुकलं?” त्याने काळजीपूर्वक बनवलेल्या वस्तू फुटून त्यांचे तुकडे झाले होते.





आपण बनवलेल्या तुटक्या वस्तू घेऊन तो म्हाताऱ्या कारागिराकडे परत आला. ते म्हणाले, “बाळ, हे चांगले मांजर होऊ शकले असते. पण तू माती चांगली मळून घेतली नाहीस. शिवाय भट्टीही फार तापली असणार.”

तोकुझो आपले काम अर्ध्यावर सोडणार नव्हता. भट्टीसाठी त्याला आणखी लाकूड हवे होते म्हणून तो वीज पडलेल्या झाडाकडे गेला. त्याने आपले काम पहिल्यापासून परत सुरु केले. आता तो दिवस-रात्र काम करू लागला.



एक दिवशी सकाळी म्हाताऱ्या कारागिरांची तब्येत थोडी बरी होती. म्हणून ते तोकुझोचे काम पाहायला आले. त्याची जिद्द आणि चिकाटी पाहून ते खुश झाले. “तुझी मांजरे आता पुष्कळ चांगली दिसताहेत. मांजराच्या शरीरात एक वजन ठेवून मग त्याचा हात हलवता येईल असा का जोडत नाहीस?” ते म्हणाले. “बऱ्याच वेळा सर्वात चांगल्या कल्पना डोळयांना दिसणार नाहीत अशा दडलेल्या असतात.”

तोकुझोने आश्चर्यचकित होऊन उडी मारली. “हो! मांजर मग जिवंत असल्यासारखे दिसेल. मनापासून धन्यवाद, कारागीर साहेब!” आता म्हातारे कारागीर देखील काम पाहून खुश झाले.



काही आठवडे गेल्यावर तोकुझोच्या मनासारखे मांजर तयार झाले. “पहा, पहा! मला जमलं! अखेर माझं स्वप्न प्रत्यक्षात आलं आहे!”

म्हातारे कारागीर आपल्या अंथरुणातून उठून पळत कारखान्याकडे पहायला आले. “शाबास! छानच केले आहेस!” ते खुश होऊन म्हणाले.

त्यांची मुलगी देखील आनंदाने टाळ्या वाजवत होती. “किती छान झाले! माझे बाबा तर आज काठी न घेताच पळत आले आहेत! तोकुझो, तुझ्या मांजराने त्यांचे दुखणे देखील पळवून लावले!”

म्हाताऱ्या कारागिराची मुलगी कुशल रंगकाम करण्यात पटाईत होती. तिने हे पुतळे रंगवायला मदत केली. “आता हे मांजर अधिकच जिवंत दिसू लागले आहे!” तोकुझो आता फार खुश झाला होता. त्याने या मांजराला नाव दिले ‘मानेकी नेको’ म्हणजे, ‘भाग्यदायी  मांजर’



लवकरच ‘मानेकी नेको’ चे पुतळे जपानमध्ये सर्वत्र दिसू लागले आणि ते सगळ्यांनाच हवे होते. काही दिवसांनी लोक म्हणू लागले, उजवा हात वर केलेले मांजर असेल, तर त्यामुळे धन-संपत्ती मिळते आणि डावा हात वर केला असेल, तर सुख आणि समाधान  मिळते.



“गुरु महाराज, तामा खरोखर मेले होते का?” म्हाताऱ्या कारागिराने विचारले.

“हे पहा, शरीर नष्ट होऊ शकते, पण आत्मा कधीच मरत नाही. म्हणून तामा आपल्या मनात कायम जिवंत राहू शकते.”

आपण आज काय करतो यावर उद्या कसा असेल हे ठरते याची ‘मानेकी नेकोच्या’ गोष्टीने आपल्याला कायम आठवण राहील. आपण काय केले ते एखाद्या लहानशा मांजराच्या पिलाच्या देखील लक्षात राहते आणि ते आपला जीव देखील वाचवू शकते, किंवा आयुष्यभर आपला मित्रही होऊ  शकते.

समाप्त